**संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठाशी संबंधित विविध मुद्यांबाबत चौकशी समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय: बैठक २४०८ /ई-८३६९०१/विशि-१,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- १२ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा:-** उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा शासन निर्णय क्र.बैठक २४०८ /ई-८३६९०१/विशि-१, दिनांक ७ ऑक्टोबर,२०२४.

**प्रस्तावना :-**

संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठाशी संबंधित विविध मुद्यांबाबत चौकशी करुन अहवाल सादर करण्यासाठी दि.७ ऑक्टोबर, २०२४ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती. तथापि, यासंदर्भात दाखल झालेल्या याचिकेमध्ये मा. उच्च न्यायालयाने समितीच्या कामकाजास स्थगिती दिली होती. यास्तव समितीची पुर्नरचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

०१. दि. ७ ऑक्टोबर,२०२४ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

०२. संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठाशी संबंधित विविध मुद्यांबाबत चौकशी करुन अहवाल सादर करण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| क्र. | समिती सदस्यांचे नाव व पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १. | न्या. मारोतीराव गायकवाड, निवृत्त न्यायाधीश, मुंबई उच्च न्यायालय. | अध्यक्ष |
| २. | श्री. शिवाजी ठोंबरे, सहायक संचालक (लेखा), उच्च शिक्षण संचालनालय, पुणे. | सदस्य |
| ३. | डॉ. परवीन सय्यद, वरिष्ठ कायदा अधिकारी, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे. | सदस्य |
| ४. | श्री. केशव तुपे, विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग. | सदस्य सचिव |

०३. समितीची कार्यकक्षा खालील प्रकरणांची चौकशी करणे अशी राहील:-

१. आर्थिक लेखा परिक्षणाचे शुल्क विद्यापीठाने अदा न करणे.

२. मॉडेल डिग्री कॉलेज, बुलढाणा इमारत बांधकामासाठी निधी वितरीत होऊन देखील अद्याप बांधकाम पूर्ण न करणे.

३. आकृतीबंधासंदर्भातील दि.२२.११.२०११ चा शासन निर्णय रद्द झाला असताना त्या शासन निर्णयाच्या आधारे कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यात आल्याबाबत.
४. विद्यापीठाने त्यांच्या फंडातून रोजंदारी कर्मचाऱ्यांची नियुक्ती केली आहे. अशा नियुक्त्या विद्यापीठाकडून वेळीच संपुष्टात न आणल्यामुळे न्यायालयीन प्रकरणे उद्भवून शासनावरील वित्तीय भारात वाढ होत असल्याबाबत.
५. विद्यापीठाने निलंबित केलेल्या कर्मचाऱ्यांना विहित कालावधीत निलंबन भत्ता प्रदान न झाल्यामुळे न्यायालयीन प्रकरणे उद्भवून त्यास शासनास सामोरे जावे लागत असल्याबाबत.
६. अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठी पदे उपलब्ध नसतांना प्रस्ताव सादर करण्यात आल्याबाबत.
७. ज्याप्रकरणी अंनुकंपा तत्वावरील नियुक्त्या करण्यास संचालकांनी मान्यता प्रदान केली आहे, अशा नियुक्त्या न करणे/विलंबाने नियुक्त्या करणे.
८. कुलसचिव आणि संचालक, शारीरिक शिक्षण या पदांच्या नियुक्त्यांमधील अनियमिततेबाबत.
९. चौकशी दरम्यान प्राप्त होणाऱ्या इतर तक्रारी

०४. उपरोक्त समितीला आवश्यक असलेली कागदपत्रे आणि माहिती उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी कुलसचिव, संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती व सह संचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग यांची राहील. तसेच प्रस्तुत प्रकरणी उच्च शिक्षण संचालनालयाकडे उपलब्ध असलेली असलेली कागदपत्रे आणि माहिती उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी सह संचालक, उच्च शिक्षण संचालनालय (मुख्यालय), पुणे यांची राहील.

०५. समितीने वरील मुद्द्यांसंदर्भात सविस्तर चौकशी करून त्याबाबतचा अहवाल शासनास ३ महिन्यात सादर करावा.

०६. उपरोक्त समितीच्या अध्यक्षांच्या मानधनाबाबत स्वतंत्र निर्णय घेण्यात येईल.

०७. समितीच्या बैठकांच्या अनुषंगाने सर्व बाबतीत सहकार्य करण्याची जबाबदारी संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२१२१८२६२५०५०८ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.02.12 18:28:07 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, उच्च शिक्षण, पुणे.

५. कुलसचिव, संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती.
६. कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
७. सह संचालक, उच्च शिक्षण संचालनालय (मुख्यालय), पुणे
८. न्या. मारोतीराव गायकवाड, निवृत्त न्यायाधीश, उच्च न्यायालय,मुंबई
९. श्री. केशव तुपे, विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग.
१०.डॉ.परवीन सय्यद, वरीष्ठ विधि अधिकारी, सा.फु. पुणे विद्यापीठ, पुणे.
११.श्री. शिवाजी ठोंबरे, सहायक संचालक (लेखा), उच्च शिक्षण, पुणे
१२.निवड नस्ती (विशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.